# सुरतवरून मौल्यवान सामान घेऊन परतताना १

## भारवाहक भाग १




सूरतचा किल्ला सध्या असा दिसतो.

### भारवाहक – सूरतेवरून मौल्यवान सामान घेऊन परतताना... भाग 1

शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीत वेळोवेळी सधन बाजार पेठांमध्ये जाऊन तेथून राज्य कारभार चालवायला लागणारी साधन संपत्ती हस्तगत करण्याच्या मोहिमा हाती घ्याव्या लागल्या होत्या. मिळवलेली साधन संपत्ती त्यांनी वैयक्तिक उपयोगात आणली असती किंवा त्या संपत्तीचा विनियोग जवळच्या लोकात आपापसात वाटून चैन किंवा

ऐशारामात खर्च केला असता तर ते सर्वस्वी  दुष्टपणाचे, स्वार्थी आणि अनैतिक ठरले असते.

शिवाजी महाराजांच्या जीवन चरित्राचा सूक्ष्म अभ्यास करून त्यांनी ह्या साधनसामग्रीचा विनियोग कसा केला यावर अनेक विद्वान इतिहासकारांनी आपले विचार व्यक्त केले आहेत. त्यांनी नोंद केलेल्या माहितीतून, ऐतिहासिक पुराव्यातून जे चित्र दर्शनास येते त्यातून शिवाजी महाराजांनी वैयक्तिक महत्वाकांक्षेने पेटून त्या काळातील विविध भागातील राजसत्तेला टक्कर देण्यासाठी आपली सेना आणि अन्य मनुष्यबळ उभे केले नव्हते हेच प्रकर्षाने जाणवते.

आपले लष्कर तत्परतेने, शस्त्र संपन्न होऊन हिंदवी स्वराज्याची स्थापना करण्यात जनसामान्यांच्या रक्षणासाठी, धर्म, अर्थ आणि शास्त्र यावरील विचारक, कलाकार, कारागिर यांना विना अडथळा शांततापूर्ण सहजीवनाचा लाभ घडवून देण्याच्या उद्देशाने ते सदैव कार्यरत असावेत. या लोककल्याणकारी महत्वाकांक्षेने त्यांनी राज्य निर्माण केले, वाढवले. त्यांच्या दूरदृष्टीचा आवाका लक्षात न आल्याने अनेक वरिष्ठ तत्कालीन सुभेदार, जमीनदार, किल्लेदार आपापल्या जहागिरीला धक्का बसेल या भितीने शत्रू झाले असावेत. राज्यकारभाराची जाण, अनुभव नसलेल्या तरूणाकडे जाऊन मिळण्यात  प्रतिष्ठा आड येऊन शक्य तितका प्रतिकार करण्यात गुंतले असावेत. त्यात जवळच्या नात्यातल्या वरिष्ठांचा समावेत होता. तर काहींना कुंपणावरील राजकारण करून जिंकणाऱ्या सत्तेसमोर मान तुकवून आपले मानमरातब, हक्क, वहिवाटी, जागिरीच्या सीमा सुरक्षित करण्यात समाधान वाटत असावे.

अपेक्षित ध्येय मिळवायचे असेल तर अशा लोकांशी शत्रुत्व करणे भाग पडले असेल.  सैन्य बळाला उपयुक्त सामान, पैसा अडका, मौल्यवान धातू, आधुनिक शस्त्रे,

शस्त्रे निर्मितीची साधने, लागणारे कारागीर व स्पेयर पार्ट्स मिळवायला शिवाजीमहाराजांना मोहिमा काढायला लागल्या असाव्यात. अशा मोहिमा यशस्वी करायसाठी श्रीमंत व्यापारी, सोनार, धनाढ्य व्यावसायिक, वाहतूकदार, कुशल कारागीर यांना साम-दाम-दंड-भेद या सर्व प्रकारे हाताळून धन संपत्ती मिळवणे हे अनैतिक ठरू नये. ह्या महत्वाच्या निकषावर महाराजांच्या मोहिमा घडल्या असाव्यात. अत्याचार, जाळपोळ, संपत्तीचे अपहरण, आणि मिळवलेल्या संपत्तीला सांभाळून ती आपल्या अखत्यारीतील सुरक्षित ठिकाणी त्यास नेऊन त्याचा योग्य वेळी योग्य कार्यात उपयोग करावा म्हणून मोजून, तोलूनमापून जपून ठेवायची व्यवस्था करण्यात आली असावी. याची एक झलक महाराजांच्या संपत्तीची मोजदाद करून मिळालेल्या नोंदीनुसार लक्षात येते.

अशा मोहिमांमध्ये सूरत या त्या काळातील जगातील सर्वात श्रीमंत गाव म्हणून नावलौकिक असलेल्या बाजारपेठवर महाराजांचे डोळे नसतील असे कसे होईल? विशेषतः सन १६६० च्या आसपास दक्षिणेचा सुभेदार शाहिस्तेखान पुणे विभागात ३ वर्षे राहून आपल्या प्रचंड लष्करासह तळ ठोकून बसल्याने महाराजांना आपल्या सैन्याची घडी नीट बसू देण्याकरता १६६४ मधे आणि सन १६६५ च्या करारामध्ये गमावलेल्या किल्ले आणि जमिनीमुळे, राज्य कारभाराचे अपरिमित झालेले नुकसान भरपाई होणे अति आवश्यक झाले होते. त्यामुळे ऑक्टोबर सन १६७० मधे सूरतेवरून दुसऱ्या वेळी चाल करून जाऊन संपत्ती मिळवायला मोहिमा काढून यशस्वी केल्या गेल्या.

या मोहिमेतून परतताना मिळवलेली संपत्ती आणि जड, अवजड सामान सूरतेवरून आपल्या राज्यात सुरक्षितपणे आणणे ही जोखमीची जबाबदारी पार पाडावी लागणार होती. शिवाजी महाराजांनी या मोहिमा कशा आखल्या? प्रत्यक्षात कशा अमलात

आणल्या? त्यात शत्रूच्या अपेक्षित हल्ल्याला कसे सामोरे जावे लागले? आपल्या नियोजनात वेळोवेळी बदल करून सर्व साधन सामुग्रीला आणताना कोणते धूर्त लढाई तंत्र वापरले? कांचनबारीतील हुलकावणीची लढाई कशी खेळली? याची कल्पना आजच्या पिढीला समजून घ्यायची असेल तर?

मिळवलेल्या संपत्तीचा काही भाग जमिनीवरून वाहून नेण्याच्या धोक्याला आटोक्यात ठेवण्यासाठी नाविकदलाच्या ताफ्यातून बोजड, पण किमती सामान जलमार्गाने पाठवून कशी कल्पकता दाखवली असावी?

या सर्वाचा एक मिलिट्री कमांडरच्या नजरेतून अभ्यास करत असताना या मोहिमांमध्ये भारवाहक जनावरे आणि त्यांचे चालक यांचा यात फार महत्त्वाचा आहे याची जाणीव होते. या अंगांनी विचार करता त्या जनावरांचे चालक वाटाडे म्हणून कामाला येत असावेत. जेंव्हा शक्य असेल तेंव्हा तांड्यांसोबतीने जाता जाता डोळे चुकवून चलाखीने पसार व्हायचे प्रयत्न त्यांनी केले असले पाहिजेत. म्हणून शिवाजी महाराजांच्या सैन्याला तांड्यांसोबतीने कडक पहाऱ्यात सदैव तत्पर असावे लागले असेल आणि शत्रूच्या अखत्यारीतील प्रदेशात सैन्य हल्ला परतवून लावायला सज्ज असावे लागले असेल. अशा दुहेरी कामात अडकून मिळवलेली साधनसंपत्ती पूर्णपणे गमवायची वेळ येऊ नये म्हणून रात्रंदिवस सावधान राहावे लागले असेल.

हस्तगत संपत्ती आणि सामान काय काय असावे? ते वाहून नेण्यास कोण कोणत्या जनावरांचा उपयोग केला गेला असेल? त्या जनावरांची एका टप्प्यात ओझी वाहन क्षमता, चालायची दमणूक, चारापाणी, विश्रांती, सोबतच्या चालकांची जेवणाखाण्याची, नंतर परतीच्या बोलीवर दिले जाणारे मानधन, विभाग बदलला की बदलती जनावरे, त्यांच्या अंगावर लादलेल्या गोण्या, पडशा, त्यांतील माल खाली पडू नये म्हणून दोर

बांधणी, जनावरांच्या अंगावरून खाली घसरून न जाण्यासाठी लाकडी साडगी, पट्टे, नाकातील वेसण्या वगैरे मधून या तांड्याचे संचलन किती जिकीरीचे आणि वेळखाऊ असेल याचा विचार केला पाहिजे.

आजच्या काळातील मिलिट्री कमांडरच्याकडे हे नियोजन करण्यास सांगितले की तुम्ही सेना नायक म्हणून [1]१० हजार घोडदळ आणि १० हजार पायदळ (इति सेतु माधवराव पगडी यांच्या छत्रपती शिवाजी महाराज — सूरतेची लूट पान ९९ वरील संदर्भ खाली पहा) (मला पायदळाची संख्या २ ते ३ हजार इतपत बरोबर वाटते. विचार करा इतक्या सैन्याला तिन्ही त्रिकाळ भोजन, जलपान व बरोबरच्या जनावरांना चारापाणी याचा खर्च लुटीपेक्षा जास्त व्हायला नको) यासह सध्याच्या सुरत शहरात एका हवेलीवर ताबा मिळवा. तिथून शहरात मिळेल त्या ठिकाणी सशस्त्र हल्ला करा. तेथील लोकांना धमकाऊन, वेळ पडली तर जिवे मारून त्याच्या ताब्यातील किंमती वस्तू हस्तगत करा. जो कोणी जास्तीत जास्त माल जप्त करून आणेल त्याला त्या प्रमाणात इनाम दिले जाईल. हे काम पुढील ७२ तासात करून संपवाचे आहे....

---

1 99 of 170

या मोहिमेसाठी शिवाजीमहाराजांनी दहा हजार घोडेस्वार, आणि दहा हजार पायदळ असे सैन्य आपल्याबरोबर घेतले होते. त्यांच्याबरोबर प्रतापराव गुजर, पेशवे मोरोपंत आणि इतर प्रसिद्ध सेनापती आणि अधिकारी होते. महाराज हे कल्याणहून निघाले. त्यांनी सुरतेवर पहिली स्वारी केली त्यावेळी ज्या मार्गाने ते गेले त्याच मार्गाने ते आताही गेले. हा मार्ग म्हणजे सध्याच्या ठाणे, नाशिक, आणि डांग या जिल्ह्यांतून जात होता. सन 1670 च्या 3 ऑक्टोबर रोजी महाराज हे सुरत शहराच्या तटबंदीपाशी आले. शहरातील मोगलांची शिबंदी ही किल्ल्यावरील तोफांच्या आश्रयाला धावली.

समजा, जो आदेश शिवाजी महाराजांनी आपल्या सैनिकांना दिला होता तसा तो सध्याच्या मिलिट्री कमांडरने आपल्या दलास दिला आहे. जे या लेखनाचे वाचक आहेत ते  म्हणजे आपण या दलातील तत्पर, निष्ठूरपणे हुकुमाची अंमलबजावणी करणारे शिवबांचे लष्करी सैनिक आहात.  तुम्ही सामान्यतः ५० किलो वजन उचलून आणू शकता. जास्तीत जास्त ८० किलो वजन ओढत किंवा अन्य तऱ्हेने आणू शकता. ते अंतर जाऊन येऊन ५ किमी आहे. कोणत्याही पेठेतील दुकानातून सहजपणे माल मिळत नाही. मारपीट आणि बांधून ठेवल्याशिवाय माल मिळत नाही...

जस्ट डायल किंवा तत्सम आधुनिक तंत्राचा वापर करून सुरतेत बाजारात पेठा, दुकाने, यांचे तपशील उपलब्ध होतील. त्या काळाच्या वातावरणाचे भान ठेवून मॉल, एटीएम, सिनेमा, हॉटेल्स, आयटी पार्क, ऑफिसेस, असे प्रकार वगळावे. सोईसाठी सध्याचे सूरत रेल्वे स्थानक हे शिवाजी महाराजांच्या वास्तवाचे, माल एकत्र करायचे केंद्र होते असे मानावे. बँक म्हणजे सावकारी पेढी. पहिल्या दिवशी हातघाईच्या लढाया झाल्या. नंतर जाळपोळीच्या भितीने लोकांना प्रतिकार करण्याची हिम्मत राहिली नाही, असे मानले तर आपण काय काय प्रकारचे सामान, मौल्यवान वस्तू, धातू, कापडचोपड, आणू शकाल? पहा प्रयत्न करून. निदान दहा तरी सहभागी होतील असे अपेक्षित आहे.

(डिस्क्लेमर – हा वैचारिक कार्यक्रम आहे प्रत्यक्षात अंमलबजावणी करण्याचा नाही..)

मिसळपाव.कॉम... २९३७ वाचने

या बाजूने कधी विचारच केला

28 Jan 2019 - 10:49 am | *आनन्दा*

या बाजूने कधी विचारच केला नव्हता...
बाकी मी थोडासा विचार करतो तर या कामाचे ३ विभाग असतील.
१. अश्वदल - जे सुरक्शा देते

२. कामगार - जे खणती लावुन प्रत्यक्ष संपत्ती शोधतात
३. हमाल - जे ही संपत्ती डोक्यावरून/गाड्यावरून वाहून सरकारात जमा करतात.

या तिघांच्या सुसूत्र हालचालींतूनच हे शक्य झाले असावे.
आणि अजुन एक राहिले - ते म्हणजे हेरखाते, कारण कुठे जायचे ते कळायला नको का?

# भारवाहक

# भाग २

भाग २...

## सूरत शहरातून निघाल्यावर...

मित्रांनो आपण भाग १ वाचला आहे. समजा त्यात म्हटले आहे त्या प्रमाणे माल जप्त केला गेला आहे... तर मिलिट्री कमांडरच्या नजरेतून अभ्यास करत असताना पुढे काय करावे लागेल? याचे काल्पनिक चित्र सादर करत आहे. म्हणून असेल, असावेत असे शब्द वापरले आहेत.

सुरत शहरातील लूट मिळवून महाराज घाईघाईने निघाले असावेत. साधारणपणे जिथे माल हस्तगत केला जातो तिथून शक्य तितक्या पटकन ती जागा सोडून पाठलाग व्हायची भिती कमी असेल तिथे पोहोचून मिळालेल्या मालाची मोजणी, प्रतवारी, किंमत आणि नंतर चारशे किमीपेक्षा जास्त अंतर घेऊन जायला वाहतुकीचे

काय मार्ग अवलंबावेत याचा विचार करून सैन्याची विभागणी करायला [2]बारडोली हे गाव सोईचे असावे. कारण उन, कानसाद, अदाडा, अमलसाड , नवसारी ही दक्षिणेच्या वाटेवरील खेडी-गावे समुद्रसपाटीपासून १० मीटरपेक्षा कमी उंची वर आहेत म्हणून वाटेत दलदली, आणि पूर्णानदीचे पात्र समुद्राला मिळताना भरती ओहोटीचा प्रभावपडून रुंद होत असल्याने त्यातून हजारो जनावरांना घालून इतक्या लांब येऊन हिम्मत करून मिळवलेला माल वाहून न जावा किंवा ओला होऊन खराब व्हायची शक्यता लक्षात घेणे मिलिट्री कमांडरांना म्हणजेच महाराजांच्या लेखी महत्वाचे ठरते.







2 91 (10 भारवाहक - भाग सुरतेवरून मौल्यवान सामान घेऊन जाताना )16 March 2022

पहिला तळ बारडोलीला ...

सूरत ( समुद्रसपाटीपासून उंची १० मीटर) हून बारडोली अंतर ४० किमी. सपाट ३० मी. उंची, नदी, ओहोळाचे पात्र ओलांडायला सोपे. ताशी ३ ते ४ किमी १० तासात कापून रात्री मुक्काम. तिथे रात्रीच्या शांत वेळात [3]लुटीचे तीन किंवा जास्त भाग केले असावेत.

**१.पहिला भाग बोजड सामानाचा** - कनातीचे खांब, गालिचे, लहान मोठे तंबू, खुंट्या दोर, विदेशातून आलेले कापड गठ्ठे, तोफांच्या दारूची, हत्यारांची लहान-मोठी लाकडी खोकी, अवजड लोखंडी उपकरणे, जेवणावणी बनवायची उंची भांडी- कुंडी, शोभिवंत अवजड दरवाजे, नक्षीकाम केलेल्या जाळ्या, लाकडी कोरीवकाम,

[3] सेतु माघवराव पगडी यांच्या छत्रपती शिवाजी महाराज – सूरतेची लूट पान ९९

शिवाजीवरील इंग्रजी रेकॉर्डमध्ये म्हटले आहे मराठ्यांनी सगळ्या शहराचा ताबा घेतला. तार्तर लोक ( मध्य आशियाचे रहिवासी ) आपल्या वाड्याचे संरक्षण करण्यास असमर्थ ठरले.

त्यांनी आपल्या राजाला रात्रीच्या वेळी किल्ल्यात नेले. मागे राहिलेले सगळे वाडे महाराजांच्या हातात आले. त्या वाड्यातून त्यांना प्रचंड खजिने मिळाले. सोने, चांदी, मूल्यवान थाळ्या, सोन्याचा पलंग आणि इतर मूल्यवान सामान (कपाटे, बैठकी वगैरे) असे त्यांना मिळाले. या अवधीत शत्रूंनी (मराठ्यांनी) शहरातील मोठमोठी घरे संथपणे अक्षरशः धुवून काढली. अशा घरातून त्यांना प्रचंड खजिने आणि मूल्यवान वस्तू मिळाल्या. त्यांनी अनेक ठिकाणी आगी लावल्या आणि जवळ जवळ निम्मे शहर जाळून नष्ट केले.

तिसऱ्या दिवशी महाराज सुरतेहून निघाले. त्यांनी सुरतेहून आपल्याबरोबर घेतलेल्या संपत्तीचे मूल्य 50 लाख रूपयांच्या वर होते. आपण सुरतेवर का हल्ला

हस्तिदंताचे खोके, लोखंडी माल, तांबे पितळेची अवजड चीजवस्तू, अन्य समुद्रातून आणताना ओलेचिंब झाले, बुडले, नष्ट झाले तरी चालेल असे सामान.

**२. दुसरा भाग- अती किमती माल** - तयार हिरे, सुवर्णचे दाग-दागिने, सोन्या, चांदीच्या लडी-विटा, तांब्याचा तारांच्या गुंडाळ्या पत्रे, मोहोरा, दाम, वराह, महमूदी, लारी, पौंड, शिलिंग, रियाल अशी विविध देशोदेशींच्या चलनांच्या थैल्याच्या थैल्या भरलेल्या रोख रक्कमा, मौल्यवान तयार हिरे (डायमंड), माणिक (रूबी), पाचू-पन्ना (इमराल्ड), निळे, पिवळे (सफायर) वगैरे शिवाय पैलू पाडायला आलेली रत्ने, मोती( पर्ल) विविध आकाराच्या धारदार पात्यांच्या रत्नजडित मुठींची शस्त्रे. किंमत जास्त पण पाठीवरून वाहून न्यायला सोईचा असा कोठल्याही परिस्थितीत न गमवायचा ऐवज.

**३. तिसरा भाग - गमावायला लागला तरी चालेल असा ऐवज.**

परदेशातून आलेले कागदांचे गठ्ठे, किमती कापड तागे, मसाल्याचे पदार्थ, अफू? चहा? परदेशात विकायला तयार ठेवलेली मालाची खोकी, गठ्ठे, गासोड्या. रेशमी धागे, कापड, हा माल गमावायला लागला तरी चालेल असा ऐवज.

कोणता माल उचलायचा आणि कोणता नाही ते महाराजांनी त्यांना आधीच्या १६६४ सालामधील प्रकारातून अनुभवाने ठरवलेला किंवा माहितीतला असावा.

दिनांक ६ ऑक्टोबर १६७० सकाळी ६ वाजल्यापासून... सर्व जनावरांचे तांडे एकामागोमाग लावून आधी बैलावरील मालवाहक वाटाडे ज्यांना त्या भागातील बोलीतून गाववाल्या लोकांकडून पुढे जाऊन खायची प्यायची सोय करायला पुढाकार

घेणारे असावेत. नंतर वेगवेगळ्या जातीच्या गाढवांच्या तांड्यांसोबत पायदळाचे महाराजांच्या माहितीतील सरदार सैनिक. त्यामागे चाकांच्या गाड्यांना ओढत नेणाऱ्या जनावरांचा काफिला असे हळूहळू सकाळी दहा पर्यंत सर्व मालजनावरे सुरतेची वेस ओलांडून पुढे गेल्यानंतर महाराजांच्या बरोबर असलेल्या खास रक्षकांची स्क्वाड्स, संदेशवाहक हलकारे, जासूसी टोळी जायला तयार झाले असावेत. तो पर्यंत दहा हजार सैन्यापैकी सात हजार घोडदळ पुढची फळी (ॲडव्हान्स फोर्स) पुढे गेले असावे. उरलेल्यांना सुरतच्या तापी नदीच्या पलीकडील काठावर, अहमदाबादहून सुभेदार बहादूर खानाचे सैन्य घेऊन आला तर त्याला थोपवला ठेवले असावे. या मध्ये महाराजांच्या आपल्या बरोबरचे १ हजार सैन्य मागच्या आणि पुढच्या फोर्सशी संपर्कात राहून आपल्या कडील सैन्य संचलनाच्या आज्ञा, संदेश मिळवून पुढील कूच करायचे नियोजन करण्यात मदत करत असावेत.

सुरतच्या जनतेतील आर्थिक विषमता इतकी असेल की आपण इथून निघून गेल्यावर प्रचंड गहजब माजून जे काही हाती लागेल ते पळवून नेणारे झुंडीने लुटालूट, जाळपोळ, धार्मिक दंगे, आपापसातील वैर याला उत येऊन मुगलांना त्यांना आवरता आवरता अशक्य होईल आणि ते सर्व जान-मालाचे, विदेशी व्यापाराचे, जहाज वाहतूकीचे अपरिमित नुकसान, करोडोंचे दरवर्षी मिळणारे जकातीचे उत्पन्न पुढील अनेक वर्षाकरिता न भरणाऱ्या जखमेप्रमाणे ठसठसत राहणारा असेल. हे कलंक ‘सिवा’च्या म्हणजे महाराजांच्या नावावर लावले जाणार आहेत! याची पूर्ण जाणीव ठेवून ‘आता नाही तर कधीच नाही’ या इरिशिरीने इथून पार घरपोच होईपर्यंत अगदी जपून

व न गमावता नेणे ही प्रचंड कसरत आहे याची जाणीव महाराजांना म्हणजे सध्याच्या मिलिट्री कमांडरच्या आखणीत आहे.

…

सरावाच्या मालवाहक जनावरांना १२ तास पिदडवून मधे मधे थांबत 2 तास, वैरण, दाणापाणी यासाठी विश्रांती, एका गाढवावर (त्याचा आकार, वय पाहून दोन्ही बाजूला लटकलेल्या पडशात एकूण *५० ते ७० किलो भार त्याच्या बरोबरच्या चालकाच्या खांद्याला पाण्याच्या पिशव्या. अशी एकूण गाढवे, बैल, बैलगाडी १ हजार होती असे मानले तर (म्हणजे ५ ते ७ शे टन) म्हणजे सध्याच्या काळात **५ टन मालवाहू टाटा कंपनीचे १०० ते १४० ट्रक . आता १ हजार मालवाहक जनावरे किंवा (सध्याच्या काळातील १४० ट्रक)** एका मागे एक जात असताना त्यांच्यावर सतत लक्ष ठेऊन ते आपापसात संगनमत करून मधल्यामधे सटकून पसार होऊन जात नाहीत ना? कारण त्यांना माहिती आहे 'हपापाचा माल गपापा' केला तर कोण पकडणार नाही!

…





* जगातल्या काही गाढवांच्या जाती १५० किलो पर्यंत वाकडेतिकडे आणि जड माल लीलया नेताना वापरल्या जातात. पण एका वेळी ते किती दूरवर असे वजन नेऊ शकतात हे नक्की माहित नाही. म्हणून ५० ते ७० किलो इतपत वाहून नेतील असे

धरले आहे. बैलगाड्या वापरात होत्या. त्या अन्य बरोबरचे अंथरूण, खायच्या वस्तू, शिधा-सामान, बाया-मुलांना, वृद्ध लोकांना नेण्याकरिता वापरले जात असावे.

तळटीप :-१६६४ च्या नंतर औरंगजेबाने सूरत शहराला संरक्षक भिंत बांधून द्यायचा हुकूम दिला होता. पण गलथानपणा, आपापसातील हेवेदावे, पैशाचा अपहार यामुळे भिंतीचे काम अर्धवट सोडून दिले होते. एप्रिल १६७० पासून शिवा सुरतेवर हल्ला करायला निघाला अशा बातम्या वेळोवेळी येत म्हणून ५ हजार फौज घेऊन गुजरातचा सुभेदार बहादुरखान व्यापाऱ्यांच्या समाधानासाठी काही महिने सुरतेत राहिला होता. पण उत्तरेत अफगाणिस्तान आणि इराणमधे संघर्ष सुरु झाला म्हणून औरंगजेबाने दक्षिण सुभ्यातील अनेक वेचक सरदारांना त्यांच्या सैन्यासह पंजाब, सिंध भागात नेमले. अशाच एका सैन्य पथकातून नेतोजी पालकरांची रवानगी काबूल मोहिमेला झाली होती.

[4]विरजी व्होरा हे सुरतेतील व त्यावेळच्या बाजारपेठेतील व्यापारी व सावकार जगाच्या अव्वल स्थानावर होते. त्यांच्या शिवाय अनेक देशी-विदेशी व्यापारी व पेढी चालवणारे सावकार आपले व्यवसाय करत होते. यांच्या अर्थिक उलाढालींवरील करातून मुगल राज्यकारभाराला दरवर्षी करोडोंचा महसूल मिळत असे. अशा शहरावर दहशत निर्माण करून महसूलात खंड किंवा कमतरता आणली तर राजसत्तेला आपल्या सैनिक मोहिमांवरील खर्च करायला ताण पडून त्यांवर कपात करायला लागणे होऊ शकत होते. मात्र त्यातून गैर मुस्लिम सामान्य जनतेला भरडून ती पुर्तता करण्याची शक्यता होती. व्यापाऱ्यांनी १६६४ नंतर स्वतः च्यापेढ्यांसाठी सुरक्षाव्यवस्था केली होती. पण ऐनवेळी सुरतच्या किल्ल्यावरून सैनिक सुरक्षा मिळेना म्हणून त्यांना व अन्य गबर श्रीमंत धनिकांना त्यांच्या पेढ्या, घरेदारे, मालाची कोठारे जीव

---




[4] 91 (10 भारवाहक - भाग सुरतेवरून मौल्यवान सामान घेऊन जाताना )16 March 2022

वाचवण्यासाठी उघड करून द्यावी लागली. आपली जरब बसली पाहिजे म्हणून महाराजांनी फ्रेंच, डच, इंग्रजांना धमकाऊन त्यांनी त्यांच्या वखारीबाहेर येऊन न देण्याची ताकीद दिली होती. मात्र त्या भागात जो सापडेल त्याचा शारीरिक छळ करून, मारून, धाक दाखवत माल मिळवायला गेलेल्या सैनिकांना दौलत विना अडथळा धनसंपत्ती आपणहून देण्याची सोय केली असावी. अशा पैकी एका वेळी अँथनी स्मिथ महाभाग आपल्या अंग चतुराईने मरणाच्या दारातून सुटले होते. तो वृतांत पूर्वीच्या एका धाग्यावर दिलेला होता.

.....

## सध्या सुरतच्या किल्ल्याचे स्वरूप कसे दिसते?

हे समजण्यासाठी खालील फोटो पहा. मी काही काळापुर्वी तिथे प्रत्यक्ष जाऊन पाहिला आहे. आतील हॉल मधे जणुकाही तिथे आजही तो वापरायला सोईचा आहे असे वाटावे, इतकी स्वच्छता, वातानुकूलित वातावरण, जुन्या घटनांचे फोटो व जागोजागी मोठे वोर्ड माहिती दाखवतात.

